पेंच व्याघ्र प्रकल्प येथे वन्यप्राणी स्थलांतरीत करण्याच्या अनुषंगाने चेनलिंक फेसिंग बांधकामाच्या २ अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र.डल्ब्युएलपी ०३.२४/प्र.क्र. ७३/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- ०७ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र. १०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९
३. केंद्र शासनाचे पत्र क्रमांक कक्ष१५-३० (२)/२०२३-NTCA), दिनांक ११.०८.२०२३.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२४/लेखा/प्र.क्र. ४५/७४७/२०२३-२४, दिनांक ०५.०१.२०२४.

**प्रस्तावना:-**

पेंच व्याघ्र प्रकल्पातील पश्चिम पेंच घाटपेंढरी व सालेघाट वनपरीक्षेत्रात तृणभक्षी प्राणी वाढविण्याबाबत केंद्र शासनामार्फत संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये निर्देश देण्यात आले होते. त्यानुसार वन्यप्राण्यांच्या स्थलांतरणाच्या प्रस्तावास तांत्रिक समितीच्या दिनांक ०४.०८.२०२३ रोजी अयोजित बैठकीत मंजूरी प्रदान केली आहे. त्याकरीता पेंच व्याघ्र प्रकल्पातील पश्चिम पेंच घाटपेंढरी बीटातील कक्ष क्रमांक ६८४ व सालेघाट वनपरीक्षेत्रात दक्षिण सालेघाट बीटातील कक्ष क्रमांक ६३१ व ६४२ अंतर्गत गवत कुरण विकास कामे करण्याकरीता चेनलिंक फेसिंग बांधकाम करणे प्रस्तावित आहे.

त्यानुसार पेंच व्याघ्र प्रकल्पातील पश्चिम पेंच घाटपेंढरी बीटातील कक्ष क्रमांक ६८४ व सालेघाट वनपरीक्षेत्रात दक्षिण सालेघाट बीटातील कक्ष क्रमांक ६३१ व ६४२ अंतर्गत चेनलिंक फेसिंग बांधकामाच्या रु. ३,३०,२४,७५७/- इतक्या रक्कमेच्या २ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पात्रान्वये केली आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पात्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केल्यापेंच व्याघ्र प्रकल्पातील पश्चिम पेंच घाटपेंढरी बीटातील कक्ष क्रमांक ६८४ व सालेबाट वनपरीक्षेत्रात दक्षिण सालेघाट बीटातील कक्ष क्रमांक ६३१ व ६४२ अंतर्गत चेनलिंक फेसिंग बांधकामाच्या रु. ३,३०,२४,७५७/- इतक्या रक्कमेच्या २ अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी दिलेल्या तांत्रिक मंजुरी व मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अनुषंगाने सोबत जोडलेल्या तक्त्यानुसार खालील अटींच्या अधिन राहून वित्तीय मान्यता वगळून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :

i. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
ii. अंदाजपत्रकातील बाबी मूळ ढोबळ बाबींच्या कार्यान्वयनाकरीता आहेत याची अंमलबजावणी पूर्वी खात्री करावी.

iii. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियमातील तरतूदींचा भंग होणार नाही तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४ (१), १३४ (२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११२५८३६४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.03.11 13:15:03 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

*******

महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.डल्ब्युएलपी ०३.२४/प्र.क्र. ७३/फ-१, दिनांक :- ०७ मार्च, २०२४ सोबतचे प्रपत्र.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | कामाचा तपशिल | अंदाजपत्रकाची रक्कम |
|---|---|---|
| १ | Construction of G. I Chanlink Fencing to around herbivore translocation area in West Pench Chatpendhari beat C. no. in West Pench Chatpendhari (WL) Range of Pench Tiger Reserve, Nagpur | १,४६,७३,०००/- |
| २ | Construction of G. I Chanlink Fencing to around herbivore translocation area in South Saleghat beat C. No. ६३२,६४२ in Saleghat (WL) Range of Pench Tiger Reserve, Nagpur | १,८३,५१,७५७/- |
| | **एकूण** | **३,३०,२४,७५७/-** |

******